**वितरण आदेश क्रमांक-५**
२००९-१०

स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगारयोजनेसाठीअर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S.) द्वारे जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना अनुदान.
**विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना अर्थसहाय्य.**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय, क्रमांक:स्वग्रायो-२०१०/प्र.क्र.१२/योजना-३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ८ मार्च, २०१०.

वाचा :- शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
१) क्रमांक:स्वग्रायो-२००९/ प्र.क्र.१४९/योजना-३,
दिनांक : २६ ऑगस्ट, २००९ (वितरण आदेश क्रमांक-१)
२) शासन निर्णय, क्रमांक:स्वग्रायो-२००९/प्र.क्र.१५०/योजना-३,
दिनांक : १५ सप्टेंबर, २००९ (वितरण आदेश क्रमांक-२)
३) शासन निर्णय, क्रमांक:स्वग्रायो-२००९/प्र.क्र.२३७/योजना-३,
दिनांक : १६ नोव्हेंबर, २००९ (वितरण आदेश क्रमांक-३)
४) शासन निर्णय, क्रमांक:स्वग्रायो-२००९/प्र.क्र.२३८/योजना-३,
दिनांक : १ डिसेंबर, २००९ (वितरण आदेश क्रमांक-४)

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने सन १९९९ पासून ७५% केंद्र पुरस्कृत स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना सुरु केली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने सन २००९-१० या कालावधीत वितरीत केलेल्या निधीचा समरुप राज्य हिस्सा म्हणून काही प्रमाणात उपरोक्त वितरण आदेश क्र.१ ते ४ अन्वये खाली दर्शविल्याप्रमाणे निधी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत करण्यात आला आहे :-

| अ.क्र. | वितरण आदेश क्रमांक | क्षेत्र | वितरीत निधी |
|---|---|---|---|
| १ | वितरण आदेश क्र.१ | SCP | रु.४००.०० लाख (रु.चारशे लाख फक्त) |
| २ | वितरण आदेश क्र.२ | TSP | रु.२७६.२२ लाख (रु.दोन कोटी शहात्तर लाख बावीस हजार फक्त) |
| ३ | वितरण आदेश क्र.२ | OTSP | रु.१२५.११ लाख (रु. एक कोटी पंचवीस लाख अकरा हजार फक्त) |
| ४ | वितरण आदेश क्र.३ | SCP | रु.४२४.३५ लाख (रु. चार कोटी चोवीस लाख पस्तीस हजार फक्त) |
| ५ | वितरण आदेश क्र.४ | TSP | रु.२४९.५५ लाख (रु. दोन कोटी एकोणपन्नासा लाख पंचावन्न हजार फक्त) |
| ६ | वितरण आदेश क्र.४ | OTSP | रु.२१५.०८ लाख (रु. दोन कोटी पंधरा लाख आठ हजार फक्त) |

२. आता सोबतच्या विवरणानुसार, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना त्यांच्या नावापुढे दर्शविलेला खालील लेखाशिर्षातील निधी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या दुस-या हप्त्याचा निधीचा **समरुप हिस्सा म्हणून दि.०८ मार्च, २०१० रोजी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S.) द्वारे वितरीत करण्यात आला आहे.**

३. या योजनेसाठी सन २००८-०९ पासून "२५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६ स्वयंरोजगार कार्यक्रम -१०१, स्वर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार - (०१) (०१) अनुसूचित जाती/जमाती व्यतिरिक्त लाभार्थ्यांना अर्थसहाय्य (२५०१ ०५ ४९) ४३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षा खालील निधी जिल्हाधिकारी यांचेकडून संबंधित जिहा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत केला जाणार आहे. त्यामुळे वरील वितरण आदेश क्रमांक १ ते वितरण आदेश क्रमांक ५ अन्वये वितरीत केलेल्या निधी व्यतिरिक्त आणि या वितरण आदेशा सोबतच्य विवरणपत्रात दर्शविलेल्या निधी व्यतिरिक्त, केंद्र शासनाकडील प्राप्त निधीचा समरुप राज्य हिस्सा एकूण २५% निधीच्या मर्यादेत निधी मिळण्यासाठी जिल्हाधिकारी यांचेक्डे मागणी नोंदवावी.

४. सदर निधी संबंधीत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे. आणि सदर निधी संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना अदा करण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्रदान करण्यात येत आहेत. त्यांनी संबंधीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस सदर निधी प्रदान करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक एल-३ "२५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम" **०६ स्वयंरोजगार कार्यक्रम-१०१, स्वर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार (०१)(०२) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य- (२५०१ ०५५८) ३३ अर्थसहाय्य" या उपलेखाशिर्षाखाली सन २००९-१० मध्ये केलेल्या तरतुदी मधून भागवावा.**

६. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

७. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालकांनी पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम २) कोषागारातून काढलेली रक्कम ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक.

८. ज्या जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात समरुप राज्य हिस्सा मिळाला नसेल, अशा जिहा ग्रामीण विकास यंत्रणांनी सदर हिस्सा जिल्हाधिकारी यांच्याकडून सर्वसाधारण क्षेत्रातून प्राप्त करुन घ्यावा.

९. सोबतच्या विवरणपत्राद्वारे दर्शविण्यात आलेला निधी वितरीत करण्यात आला असला तरी मंजूर अनुदानाच्या मर्यादेत व केंद्र शासनाच्या निधीच्या समरुन हिश्याच्या मर्यादेत निधी काढण्यात यावा. हा निधी अथवा

उपरोक्त सुचनेनुसारचा निधी, कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त व केंद्र शासनाच्या निधीच्या समरुप २५% हिश्यापेक्षा जास्त निधी आहरत होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००३०९१३४७१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रा. श. नागरे)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई (पांच जादा प्रतींसह).
२) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर (पांच जादा प्रतींसह).
३) विभागीय आयुक्त व त्यांच्या कार्यालयातील अपायुक्त (विकास शाखा), (सर्व) विभाग, (दोन जादा प्रतींसह).
४) जिल्हाधिकारी, सर्व.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
६) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
८) नियोजन विभाग, (का.१४११), मंत्रालय, मुंबई.
९) आदिवासी विकास विभाग, (का.१४ व ०७), मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग, (व्यय.१५) व (अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.
११) अपर संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मीक ग्रामीण विकास कार्यक्रम का (पांच प्रतींसह).
१२) कार्यासन अधिकारी, का.क्रं.वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना ७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१३) निवडनस्ती का.क्र.योजना-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

शासन निर्णय क्रं. स्वग्रायो-२०१०/प्र.क्रं.१२/ योजना- ३ ,

दि. ८ मार्च, २०१० चे जोडपत्र (वितरण आदेश क्रं.५ )

**स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना**

**अर्थसंकल्पीय प्रणाली द्वारे (B.D.S) निधी वितरण दि.८ मार्च, २०१०**

| अ.क्र | जिल्हा | (01) (02) Subsidy Non Scheduled Castes under Special Component Plan SCP (2501 0558) 33 Subsidy<br>मागणी क्रमांक एल-३ २५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम , ०६. स्वयंरोजगार कार्यक्रम - १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार (०१) (०२ ) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य- (२५०१ ०५५८) ३३. अर्थसहाय्य |
|---|---|---|
| १ | २ | ३ (रु. लाखात) |
| १ | ठाणे | ३६.०० |
| २ | रायगड | १३.०७ |
| ३ | रत्नागिरी | १४.६२ |
| ४ | सिंधुदुर्ग | ३.६० |
| ५ | धुळे | १९.८० |
| ६ | जळगांव | ३९.२४ |
| ७ | अहमदनगर | ४३.६० |
| ८ | पुणे | ५९.१३ |
| ९ | बीड | २५.६९ |
| १० | उस्मानाबाद | २१.७८ |
| ११ | लातूर | २१.६० |
| १२ | अकोला | १६.९० |
| १३ | अमरावती | ४३.५६ |
| १४ | नागपूर | ७७.६६ |
| १५ | भंडारा | ५६.०८ |
| १६ | गोंदिया | ३०.६० |
| १७ | चंद्रपूर | १४.८० |
| एकूण | | ५३७.७३ |

०८/०३/२०१०

( ग. शं. नागर )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.